**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण " या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करावयाच्या निधीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०२३/प्र.क्र.११४ /का-७अ**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १९ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:**

महिला व बाल विकास विभागाच्या पंडित जवाहरलाल नेहरु उद्योग केंद्र (बालसुधारगृह) येरवडा, पुणे व महात्मा गांधी प्रशासन व प्रशिक्षण संस्थेच्या वसतिगृह इमारतीचे नूतनीकरण करणेच्या कामासाठी लेखाशिर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,०२-समाज कल्याण, ८००-इतर खर्च (०१) (०४) इमारतींची दुरुस्ती व २७ लहान बांधकामे मागणी क्र. एक्स -१ (२२३५-२२४१) योजनेतर या बाबीअंतर्गत अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महिला व बाल विकास विभागाच्या पंडित जवाहरलाल नेहरु उद्योग केंद्र (बालसुधारगृह) येरवडा, पुणे व महात्मा गांधी प्रशासन व प्रशिक्षण संस्थेच्या वसतिगृह इमारतीचे नूतनीकरण करणेच्या कामासाठी लेखाशिर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,०२-समाज कल्याण, ८००-इतर खर्च (०१) (०४) इमारतींची दुरुस्ती व २७ लहान बांधकामे मागणी क्र. एक्स -१ (२२३५-२२४१) योजनेतर या बाबीमधून खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-२ मधील लेखाशीर्ष/उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक-७ प्रमाणे एकुण रु.६१,८४,०००/- (रुपये एकसष्ट लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये हजारात)**

| अ. क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय मंजूर तरतूद | पुरवणी मागणी | एकूण तरतूद | वितरीत तरतूद | या आदेशान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | मागणी क्र. X- 1 | | | | | |
| १. | २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,०२-समाज कल्याण, ८००-इतर खर्च (०१) (०४) इमारतींची दुरुस्ती व २७ लहान बांधकामे मागणी क्र. एक्स -१ (२२३५-२२४१) योजनेतर | २४३१.००० | ६५००.००० | ८९३१.००० | ७२९.३०० | ६१८४.००० |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. याबाबत सन २०२३-२४ करीता वरील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्याची व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५७/ व्यय-६, दिनांक ११.३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१९१७३४१८६८३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI P
KARWAR

Digitally signed by SHIVAJI P KARWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=579FDC49AAE09A107A14D18D2E6E7AEC6E608DE79CB8407CA0E64638BB98CDB0, cn=SHIVAJI P KARWAR
Date: 2024.03.19 17:43:58 +05'30'

**( शिवाजी पां.कारवार )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर,
५) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ( आयुक्तालय,पुणे मार्फत ),
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत),
७) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास, (आयुक्तालय,पुणे मार्फत),
७) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत),
८) कार्यासन(व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) कक्ष अधिकारी(का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई,
यांना सदर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित,
१०) निवड नस्ती-का-७ अ.